मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे विशेष अहवाल, स्पष्टीकरणात्मक ज्ञापनासह विधानमंडळाच्या पटलावर ठेवण्यासाठी कालमर्यादा ठरविण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शासन परिपत्रक क्रमांक : एलूपीएल् १०१० / ३९० / प्र. क्र. ९० / २०१० / १५
सामान्य प्रशासन विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १८ सप्टेंबर, २०१०

वाचा :-
१) शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र. एलपीएल १०००/प्र.क्र.१११/२०००/१५, दि. ८ मार्च, २००१
२) शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र. एलपीएल १२०२/प्र.क्र.५६/२००२/१५, दि. २० जून, २००२
३)शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र.एलपीएल १००४/प्र.क्र.६०/२००४/१५, दि.२८ सप्टेंबर, २००४
४) शासन परिपत्रक सा.प्र.वि. क्र. एलपीएल १००६/प्र.क्र.१९/२००६/१५, दि. ८ ऑगस्ट, २००६
५) शासन पत्र सा.प्र.वि. क्र. संकीर्ण १०१०/१०५/प्र.क्र.३६/१०/१५, दि. ८ जुलै, २०१०

**शासन परिपत्रक :-**

महाराष्ट्र लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त अधिनियम, १९७१ च्या कलम १२ च्या पोटकलम (७) अन्वये लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे विशेष अहवाल त्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापनासह विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात येतात.

२. सन २०१० च्या पावसाळी अधिवेशनात सन २००० ते २००९ चे लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे एकूण १३ विशेष अहवाल व त्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापन संबंधीत विभागांकडून प्राप्त झाल्यावर पटलावर ठेवण्यात आले. या कामी फार मोठा विलंब झाल्यामुळे विधानमंडळाच्या तदर्थ समितीने दिनांक १० ऑगस्ट, २०१० रोजी प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांची साक्ष घेतली. विशेष अहवाल व त्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने पटलावर ठेवण्यास प्रदीर्घ विलंब झाल्यामुळे तदर्थ समितीने तीव्र नाराजी व्यक्त केली आहे य विलंब ज्या स्तरावर झाला आहे त्या स्तरावरील कर्मचारी / अधिकाऱ्यांना समज देण्याची शिफारस केली आहे. त्याबाबत स्वतंत्रपणे संबंधीत विभागाच्या सचिवांना कळविण्यात आले आहे.

३. विधानमंडळाच्या तदर्थ समितीने त्यापुढे असेही सूचित केले आहे की, " विशेष अहवालासंबंधीची प्रकरणे शासन यंत्रणेत ५ - ६ वर्षे अगोदरच सुरु झालेली असतात. त्यामुळे


रोटा/एच-२३७१[ ३०००-९-१०]-१

शेवटच्या टप्प्यामध्ये गती देण्याचे काम करावयाचे असते. लोक आयुक्तांच्या शिफारशीसह प्रशासकीय बाबीसंबंधी निर्णय घ्यावयाचा असेल तर तीन महिन्याच्या आत निर्णय घेऊन अहवाल सादर करावा आणि धोरणात्मक बाबीमध्ये सहा महिन्याच्या आत अहवाल सादर करावा."

४. मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांच्या कामकाजास विधानमंडळाच्या कामकाजाप्रमाणे प्राथम्य देण्याबाबत संदर्भाधीन परिपत्रकान्वये वेळोवेळी सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्याचप्रमाणे संदर्भाधीन दि. २८.९.२००४ च्या परिपत्रकान्वये विशेष अहवाल प्राप्त झाल्यावर योग्य ती कार्यवाही त्वरीत करुन स्पष्टीकरणात्मक ज्ञापनासह अहवाल विधानमंडळाच्या पुढील अधिवेशनात सादर करणे अपेक्षित आहे, अशा सूचना दिलेल्या आहेत. त्याचप्रमाणे अनाठाई विलंब करणाऱ्या कर्मचारी / अधिकाऱ्यांच्या गोपनीय अभिलेखात नोंद घेण्याबाबत सूचना दिलेल्या आहेत. तरी देखील अशा प्रकरणात अनेक विभागांकडून वेळीच कार्यवाही केली जात नाही व प्रदीर्घ विलंब केला जातो, असे निदर्शनास आले आहे.

५. विधानमंडळाच्या तदर्थ समितीच्या सूचना विचारात घेता, विशेष अहवाल प्रकरणी मा. लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांनी केलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने काही धोरणात्मक निर्णय घेणे आवश्यक असल्यास ६ महिन्याच्या आत योग्य तो निर्णय घेण्याचा संबंधीत विभागांनी प्राथम्याने व कसोशीने सर्वतोपरी प्रयत्न करावा. तसेच ज्या विशेष अहवालावर धोरणात्मक निर्णय घेण्याचा संबंध येत नसेल असे विशेष अहवाल व त्यावरील स्पष्टीकरणात्मक ज्ञापन ३ महिन्याच्या आत विधानमंडळाच्या पटलावर ठेवण्याचा कसोशीने प्रयत्न करावा लागणार असल्याने ३ महिन्याच्या मुदतीसाठीसुध्दा वरीलप्रमाणे संबंधीत विभागांनी कसोशीने व प्राथम्याने कार्यवाही करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करावा. प्राथम्याने व कसोशीने आवश्यक प्रयत्न व उपाययोजना करुन देखील एखाद्या विशेष अहवालातील शिफारस कायदेशीरदृष्टया व आर्थिकदृष्टया स्विकारणे शक्य नसल्यास, संबंधीत विभागांनी अधिक कालापव्यय न करता त्यासंदर्भातील कारणे नमूद करुन स्पष्टीकरणात्मक ज्ञापनास विभागाच्या मा. मंत्री महोदयांची मान्यता घेऊन, ते पुरेशा कालावधीपूर्वी या विभागास सादर करावेत.

६. तरी सदरचे अहवाल आपल्या विभागास प्राप्त झाल्यानंतर त्याबाबतची स्पष्टीकरणात्मक ज्ञापने मराठी / इंग्रजी या विभागास पाठविण्याची वरील प्रमाणे कार्यवाही करावी. वरील सूचना सर्व संबंधीतांच्या निदर्शनास आणून द्याव्यात व त्याप्रमाणे अंमलबजावणी करण्याची सर्वांनी दक्षता घ्यावी. जेणेकरुन विहीत मुदतीत ते पटलावर ठेवण्याची कार्यवाही या विभागाकडून करणे सुकर होईल. वरील सूचनांप्रमाणे काटेकोरपणे अंमलबजावणी न झाल्यास व अनाठाई विलंब झाल्यास संबंधीतांना जबाबदार धरण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

15/9/10

( के. पी. बक्षी )
प्रधान सचिव (सेवा)

प्रति,

शासनाचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने

प्रत,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
* प्रबंधक , उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधानसभा), मुंबई
*प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद), मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
निवड नस्ती

* पत्राने

संगणक संकेतांक - २०१००९१६१४१६०६००१

--------